**मौजे मजरेवाडी, आकीवाट, तेरवाड-१ व तेरवाड-२ ता. शिरोळ, जि. कोल्हापूर या गावांतील राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या समस्याग्रस्त जमीन सुधारणा या उप योजनेतंर्गत सच्छिद्र निचरा प्रणालीचा वापर करून क्षारपड जमीन सुधारणा प्रकल्प रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: राकृवि २०२२/प्र.क्र.५७/१४-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १७ मे, २०२२.

**संदर्भ :**

१. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.राकृ/प्र.क्र. ७४/१४-अे, दि. ०८ मार्च, २०१९
२. राज्य स्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या (SLSC) २५ व्या बैठकीचे इतिवृत्त- पत्र क्र. आरकेव्ही-०५१८/प्र.क्र.१६२/१४-अे, दि. २७ ऑगस्ट, २०१८
३. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र ११-९/२०१६-NRM-I, दि. ४ फ़ेब्रुवारी, २०१९
४. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १-१५/२०१८ आरकेव्हीवाय, दि. १३ फ़ेब्रुवारी, २०१९
५. राज्य स्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या (SLSC) २९ व्या बैठकीचे इतिवृत्त- पत्र क्र. आरकेव्ही-०१२०/प्र.क्र.१४/१४-अे, दि. ०५ जुलै, २०२१
६. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १-१५/२०२१ आरकेव्हीवाय, दि. ०१ नोव्हेंबर, २०२१

**प्रस्तावना :**

कोल्हापूर जिल्हयातील शिरोळ तालुक्यातील सुमारे ९४०० हे. जमीन रासायनिक खताचा अति वापर, जादा प्रमाणातील सिंचन, नैसर्गिक ओढ़े व नाले या मधील अवरोध इ. कारणामुळे क्षारपड व पाणथळ होऊन नापिक ठरल्याने जलसंधारण विभागाने मौजे मजरेवाडी, आकीवाट, तेरवाड-१ व तेरवाड-२, ता. शिरोळ, जि. कोल्हापूर येथे निचरा प्रणालीद्वारे सुमारे ७३२ हे. क्षारपड जमीन सुधारणा करणेबाबत रु. १६६४.८७ लाख प्रकल्प खर्चाच्या सादर केलेल्या प्रस्तावास प्रती हेक्टरी ६०,०००/- प्रमाणे ४३९.३१ लाख अनुदान संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजुरी दिली होती व या प्रकल्पाकरिता रू. २.१९ कोटी निधी वितरीत केला होता. तथापि, सन २०१८-१९ मध्ये वितरीत केलेला सदर निधी अद्यापही खर्ची पडला नसून तो अंमलबजावणी यंत्रणेने कृषि आयुक्तालयास समर्पित केलेला आहे. सबब, मागील ३ वर्षात या प्रकल्पांतर्गत काम पूर्ण होऊन निधी खर्ची पडला नसल्याचे लक्षात घेता सदर जमीन सुधारणा करण्याचा प्रकल्प रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे :

**शासन निर्णयः**

१. सन २०१८-१९ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत समस्याग्रस्त जमिन **सुधारणा** (Reclamation of Problematic Soil) या उप-योजनेंतर्गत मौजे मजरेवाडी, आकीवाट, तेरवाड-१ व तेरवाड-२, ता. शिरोळ, जि. कोल्हापूर येथे सच्छिद्र निचरा प्रणालीव्दारे सुमारे ७३२ हे. क्षारपड जमीन सुधारणा करणेबाबत दि.०८ मार्च, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता व या प्रकल्पासाठी रू. २.१९ कोटी निधी वितरणास दिलेली मंजुरी देखील या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५१७१६५७१८८१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRIKANT C ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPT., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, pseudonym=1CC019CBB7F0A77E397F15793DF809A69806ED98, serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT C ANDGE
Date: 2022.05.17 16:59:54 +05'30'

**( श्रीकांत चं. आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
२. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई,
३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. सचिव (जलसंधारण), मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. मुख्य अभियंता, लघु सिंचन (स्थानिक स्तर), पुणे,
८. संचालक (प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे,
९. महालेखाकार (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई,
१०. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
११.कार्यकारी अभियंता, लघु सिंचन (स्थानिक स्तर), जि. कोल्हापूर,
१२.सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे,
१३.वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई,
१४.मा. मंत्री (कृषि व फलोत्पादन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१५.मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१६. निवड नस्ती.